**श्रीमती रामाणे अश्विनी अमर, प्रभाग क्र. ७७, नगरसेवक कोल्हापूर महानगरपालिका यांनी निवडून आल्याचे घोषित झाल्याच्या दिनांकापासून १२ महिन्याच्या मुदतीत जात वैधता प्रमाणपत्र सादर न केल्याने त्यांची निवड भूतलक्षी प्रभावाने रद्दबातल करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग,**
**शासन आदेश क्रमांक - एमयुपी-२०१६/प्र.क्र.१९१/नवि-१९**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १० डिसेंबर,२०१८

**<u>संदर्भ</u>** :- १) आयुक्त, कोल्हापूर महानगरपालिका यांचे पत्र निवडणूक कार्यालय जा.क्र.२५८/२०१८,दि.१२/१०/२०१८व क्र.२६३/२०१८,दि.०७/१२/२०१८
२) सन २०१८ चा महाराष्ट्र अध्यादेश क्रमांक २० दिनांक २७/०९/२०१८

**<u>प्रस्तावना</u> :-**

कोल्हापूर महानगरपालिकेच्या सार्वत्रिक निवडणूकीचा निकाल दिनांक ०२/११/२०१५ रोजी घोषित करण्यात आला. त्या निवडणूकांमध्ये निवडून आलेल्या मात्र जात वैधता प्रमाणपत्र सादर न करता सहा महिने कालावधीत सादर करण्याचे हमीपत्र सादर करणाऱ्या उमेदवारांसाठी, सदर जात वैधता प्रमाणपत्र सादर करण्याची सहा महिन्यांची मुदत दिनांक ०१/०५/२०१६ पर्यंत होती.

०२. सन २०१८ चा महाराष्ट्र अध्यादेश क्र.२०, दिनांक २७/०९/२०१८ रोजी असाधारण राजपत्रात प्रख्यापित झाला आहे. उक्त अध्यादेशात महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ५ (ब) व १९ (१ब) या कलमांमध्ये सुधारणा करण्यात आली असून, याद्वारे राखीव असलेल्या जागेसाठी निवडणूक लढविण्यासाठी इच्छुक असलेल्या व्यक्तींना त्यांच्याकडे जात वैधता प्रमाणपत्र नसले तरीही त्यांना निवडणूकीत भाग घेता यावा यासाठी जात वैधता प्रमाणपत्र सादर करण्याबाबत असलेली मुदत "सहा महिन्यां" वरुन "बारा महिने" इतकी वाढविण्यात आलेली आहे. तसेच सदर तरतूदी पूर्वलक्षी प्रभावाने दिनांक ०७/०४/२०१५ पासून लागू करण्यात आल्या आहेत.

०३. श्रीमती रामाणे अश्विनी अमर, नगरसेवक, प्रभाग क्र. ७७ कोल्हापूर महानगरपालिका यांनी अध्यादेश क्र.२०, दिनांक २७/०९/२०१८ मधील उपरोक्त तरतूदीनुसार अद्यापपर्यंत जात वैधता प्रमाणपत्र सादर केलेले नसल्याने, अध्यादेश व अधिनियमातील नियम क्र.५(ब) च्या तरतूदीनुसार त्या पालिका सदस्य म्हणून अनर्ह ठरत आहेत, असे आयुक्त, कोल्हापूर महानगरपालिका यांनी त्यांच्या संदर्भाधिन क्र.१ येथिल पत्रांन्वये कळविले आहे.

०४. सन २०१८ चा महाराष्ट्र अध्यादेश क्र.२०, दिनांक २७/०९/२०१८ अन्वये मुंबई महानगरपालिका अधिनियम, महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम व महाराष्ट्र नगरपरिषदा, नगर पंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम, १९६५ मध्ये सुधारित तरतूदी करण्यात आल्या आहेत. त्यानुसार निवडून आल्याचे घोषित झाल्याचे दिनांकापासून १२ महिन्याच्या मुदतीत जात वैधता प्रमाणपत्र सादर करण्यास कसूर केल्यास, तिची निवड भूतलक्षी प्रभावाने रद्द झाली असल्याचे मानण्यात येईल आणि ती पालिका सदस्य म्हणून राहण्यास निरर्ह ठरेल.

०५. श्रीमती रामाणे अश्विनी अमर, नगरसेवक, प्रभाग क्र. ७७ कोल्हापूर महानगरपालिका यांनी जात वैधता प्रमाणपत्र सादर न केल्यामुळे महाराष्ट्र अध्यादेश क्र.२०, दिनांक २७/०९/२०१८ मधील उपरोल्लेखित तरतूदींच्या अनुषंगाने त्यांची सदस्यपदी झालेली निवड भूतलक्षी प्रभावाने रद्दबातल झाली असल्याचे आदेश निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन आदेश:-**

उपरोक्त प्रस्तावनेत नमूद केलेली वस्तुस्थिती व सन २०१८ चा महाराष्ट्र अध्यादेश क्र.२०, दिनांक २७/०९/२०१८ मधील तरतूदींच्या अनुषंगाने श्रीमती रामाणे अश्विनी अमर, नगरसेवक, प्रभाग क्र. ७७ कोल्हापूर महानगरपालिका यांनी जात वैधता प्रमाणपत्र सादर न केल्यामुळे त्यांची नागरिकांचा मागास प्रवर्ग (महिला) या राखीव पदावरील सदस्यपदी झालेली निवड भूतलक्षी प्रभावाने रद्दबातल ठरविण्यात येत असून, त्या पालिका सदस्य म्हणून राहण्यास निरर्ह ठरत आहेत.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलबध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१८१२०७१७२०३०२९२५ असा आहे. सदर शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Kailas Madhukar Badhan

Digitally signed by Kailas Madhukar Badhan
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=22804d8f98c03e9a67ca8eca6a02e7eaab4bcc4a3d59dfce4f1c7189ab74b085, serialNumber=e83c1c73de120837488d76379734db4868992e2b35ba1df8cfea9650fcff780f, cn=Kailas Madhukar Badhan
Date: 2018.12.10 10:15:39 +05'30'

**(कैलास बधान)**
**शासनाचे उप सचिव**

**प्रति,**

१) मा.राज्यपाल महोदय यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,मंत्रालय,मुंबई
३) मा.राज्य निवडूक आयोग यांचे कार्यालय,मुंबई.
४) मा.मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय्य सहायक,मंत्रालय,मुंबई

५) प्रधान सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे.
७) जिल्हाधिकारी, कोल्हापूर
८) आयुक्त, कोल्हापूर महानगरपालिका, कोल्हापूर.
९) मा.राज्यमंत्री, (नगर विकास) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
१०) सह सचिव,(नवि-१४), नगर विकास विभाग, मंत्रालय,मुंबई
११) प्रधान सचिव, (नवि-२) यांचे विशेष कार्याधिकारी, नगर विकास विभाग,मंत्रालय,मुंबई
१२) निवडनस्ती (नवि-१९)